**कार्यकारी अभियंता, यांत्रिकी विभाग, अहमदनगर या विभागांतर्गतच्या दोन उपविभागीय कार्यालयांच्या विभागीय नियंत्रणात बदल करण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- आढावा-२०१९/प्र.क्र.९७/आ.(पुनर्रचना),**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ०९ सप्टेंबर, २०२०.

वाचा:- १) वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.टिआरडब्ल्यू-१०८३/सीआर-६११/८३/ एडीएम-९, दि.८/३/१९८४
२) शासन निर्णय जलसंपदा विभाग, क्रमांक: आढावा-१००२/३३५/२००२/ आ.(प्रशि), दि.०६/०२/२००३

**प्रस्तावना :-**

सोलापूर जिल्हयातील उपसा सिंचन कामाकरिता भिमानगर येथे कार्यकारी अभियंता, यांत्रिकी विभाग, अहमदनगर यांच्या अधिपत्याखाली सिना माढा उपसा सिंचन (यांत्रिकी) उपविभाग, भिमानगर, जि.सोलापूर व उजनी जलविद्युत उपविभाग, भिमानगर, जि.सोलापूर हे दोन उपविभागीय कार्यालय कार्यरत आहेत. तथापि, भिमानगर ते अहमदनगर हे अंतर १७५ कि.मी. असल्याने कार्यालयीन कामात बऱ्याच अडचणी निर्माण होतात व त्याचा परिणाम उपसा सिंचन योजनेवर होत आहे. त्यामुळे दोन्ही उपविभागीय कार्यालयांच्या नियंत्रणात बदल करुन सदर कार्यालये यांत्रिकी विभाग, अहमदनगर येथून यांत्रिकी विभाग, सोलापूर या विभागांतर्गत जोडण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. त्यानुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे :-

**शासन निर्णय :-**

मुख्य अभियंता (यांत्रिकी), जलसंपदा विभाग, नाशिक अधिनस्त असलेल्या अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ, पुणे यांच्या अंतर्गत असलेले कार्यकारी अभियंता, यांत्रिकी विभाग, अहमदनगर यांच्या अधिपत्याखालील सिना माढा उपसा सिंचन (यांत्रिकी), उपविभाग, भिमानगर व उजनी जलविद्युत उपविभाग, भिमानगर या उपविभागीय कार्यालयांचे विभागीय नियंत्रण याच मंडळांतर्गतच्या कार्यकारी

अभियंता, यांत्रिकी विभाग, सोलापूर या विभागाकडे सोपविण्याकरिता खालील अटींच्या अधीन राहून याद्वारे मान्यता देण्यात येत आहे :-

१. कार्यकारी अभियंता, यांत्रिकी विभाग, अहमदनगर अंतर्गत असलेले सिना माढा उपसा सिंचन (यांत्रिकी), उपविभाग, भिमानगर व उजनी जलविद्युत उपविभाग, भिमानगर या उपविभागीय कार्यालयाचे विभागीय नियंत्रण कार्यकारी अभियंता, यांत्रिकी विभाग, सोलापूर या विभागाकडे राहील.
२. सदर उपविभागीय कार्यालयांच्या मंडळ नियंत्रणात, मंजूर आस्थापनेत व नावात कोणताही बदल करण्यात येणार नाही. तथापि, उपविभागीय कार्यालयांची रचना सोबत जोडलेल्या विवरणपत्रानुसार राहील.
३. मुदतवाढीचे प्रस्ताव सादर करताना उपविभागीय कार्यालयांच्या विभागीय नियंत्रणात आवश्यक ते बदल करुन प्रस्ताव शासनास सादर करावे.
४. उपरोक्त प्रमाणे विभागीय नियंत्रणातील होणाऱ्या बदलाबाबतची आवश्यक ती सर्व कार्यवाही संबंधित कार्यालयांनी करावी.
५. प्रशासकीय व आस्थापना खर्चात वाढ होणार नाही याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनावर कोणताही आर्थिक भार पडणार नाही.

२. उपरोक्त उपविभागीय कार्यालयाच्या विभागीय नियंत्रणातील बदलानुसार सदर उपविभागीय कार्यालये दिनांक ०१/१०/२०२० पासून कार्यान्वित होईल यादृष्टीने अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ, पुणे यांनी आवश्यक ती सर्व कार्यवाही तत्काळ करावी.

३. सिना माढा उपसा सिंचन (यांत्रिकी), उपविभाग, भिमानगर व उजनी जलविद्युत उपविभाग, भिमानगर या उपविभागीय कार्यालयांच्या विभागीय नियंत्रणात बदल होत असल्याने, या कार्यालयांसाठी वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.टिआरडब्ल्यू-१०८३/सीआर-६११/८३/एडीएम-९, दि.८/३/१९८४ मधील तरतूदीनुसार नियंत्रक अधिकारी, अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ, पुणे व आहरण व संवितरण अधिकारी, कार्यकारी अभियंता, यांत्रिकी विभाग, सोलापूर यांना घोषित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००९०९१२३९०९४७२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Sunil Gangaram Gangarkar

Digitally signed by Sunil Gangaram Gangarkar
DN: CN = Sunil Gangaram Gangarkar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Water Resources Department
Date: 2020.09.09 12:44:58 +05'30'

**( सु.गं.गांगरकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा.मंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव
४. मा. मंत्री (खारभूमी) यांचे खाजगी सचिव
५. मा.राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक
६. मा. राज्यमंत्री (खारभूमी) यांचे स्वीय सहायक
७. मा.विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद / विधानसभा
८. मा.विधानपरिषद / विधानसभा सदस्य (सर्व)
९. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
१०. प्रधान सचिव (ज.सं.प्र. व विकास), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
११. सचिव (ज.सं.व्य. व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/ नागपूर
१४. महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा) मुंबई/ नागपूर
१५. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१६. महासंचालक, संकल्पन, प्रशिक्षण, जलविज्ञान, संशोधन व सुरक्षा (मेरी), नाशिक.
१७. सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग.
१८. मुख्य अभियंता (यांत्रिकी), जलसंपदा विभाग, नाशिक.
१९. सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
२०. आंतर वित्तीय सल्लागार व सह/उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१. उप सचिव (सेवा)/ उप सचिव (आस्था)/उप सचिव (प्रशा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२२. सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
२३. अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ, पुणे.

२४. कार्यकारी अभियंता, यांत्रिकी विभाग, अहमदनगर.
२५. कार्यकारी अभियंता, यांत्रिकी विभाग, सोलापूर.
२६. कार्यकारी अभियंता, प्रशासन संगणकीकरण विभाग, पुणे.
(कार्यालयाच्या मुख्यालयात व नियंत्रणात होणाऱ्या बदलांची नोंद घेण्यास्तव अग्रेषित)
२७. उप अभियंता, सिना माढा उपसा सिंचन (यांत्रिकी) उपविभाग, भिमानगर, जि.सोलापूर.
२८. उप अभियंता, उजनी जलविद्युत उपविभाग, भिमानगर, जि.सोलापूर.
२९. सर्व कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३०. कार्यासन आस्थापना (पुनर्रचना) संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक-आढावा-२०१९/प्र.क्र९७/आ.(पुनर्रचना), दि.०९ सप्टेंबर, २०२० सोबतचे विवरणपत्र

| मुख्य अभियंता (यांत्रिकी), जलसंपदा विभाग, नाशिक अधिनस्त | | | | |
|---|---|---|---|---|
| अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ, पुणे | | | | |
| | सध्याची रचना | | बदलानंतरची रचना | |
| अ.क्र. | विभाग कार्यालय | उप विभाग कार्यालय | विभाग कार्यालय | उप विभाग कार्यालय |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | कार्यकारी अभियंता, यांत्रिकी विभाग, अहमदनगर | १.यांत्रिकी उपविभाग, श्रीगोंदा | कार्यकारी अभियंता, यांत्रिकी विभाग, अहमदनगर | १.यांत्रिकी उपविभाग, श्रीगोंदा |
| | | २.यांत्रिकी उपविभाग, केडगांव अहमदनगर | | २.यांत्रिकी उपविभाग, केडगांव अहमदनगर |
| | | ३.सिना माढा उपसा सिंचन (यांत्रिकी) उपविभाग, भिमानगर | | |
| | | ४.उजनी जलविद्युत उपविभाग, भिमानगर | | |
| २ | कार्यकारी अभियंता यांत्रिकी विभाग,सोलापूर | १.यांत्रिकी व विद्युत उपविभाग, सोलापूर | कार्यकारी अभियंता यांत्रिकी विभाग,सोलापूर **(यांत्रिकी विभाग, अहमदनगर या विभागांतर्गतचे २ उपविभाग या विभागांतर्गत संलग्न)** | १.यांत्रिकी व विद्युत उपविभाग, सोलापूर |
| | | २.यांत्रिकी उपविभाग, सोलापूर | | २.यांत्रिकी उपविभाग, सोलापूर |
| | | ३.यांत्रिकी उपविभाग, टेंभूर्णी | | ३.यांत्रिकी उपविभाग, टेंभूर्णी |
| | | ४.यांत्रिकी उपविभाग, पंढरपूर | | ४.यांत्रिकी उपविभाग, पंढरपूर |
| | | | | **५.सिना माढा उपसा सिंचन (यांत्रिकी) उपविभाग, भिमानगर** |
| | | | | **६.उजनी जलविद्युत उपविभाग, भिमानगर** |

Sunil Gangaram Gangarkar

Digitally signed by Sunil Gangaram Gangarkar
DN: CN = Sunil Gangaram Gangarkar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Water Resources Department
Date: 2020.09.09 12:45:35 +05'30'

( सु.गं.गांगरकर )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन